पंचायत समिती, सिंदेवाही (जि. चंद्रपुर) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मंजुरी देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** पंसई-२०१७/प्र.क्र.८०/बांध-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख: २० सप्टेंबर, २०२१

वाचा –

१) **कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद, चंद्रपूर यांचे पत्र क्रमांकः** बावि/पिओ-२/४२६१/२०१७, दिनांक १८ डिसेंबर, २०१७.
२) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांचे पत्र क्रमांकः** बावि/पिओ-२/१६११/२/२०१८, दिनांक ११ जून, २०१८.
३) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांचे पत्र क्रमांकः** बावि/पिओ-७/९४७५/२०१८, दिनांक २६ नोव्हेंबर, २०१८.
४) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांचे पत्र क्रमांकः** बावि/पिओ-७/१३०४/२०२१, दिनांक ०७ मे, २०२१.
५) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांचे पत्र क्रमांकः** बावि/पिओ-७/१७९४/२०२१, दिनांक ०९ जुलै, २०२१.

प्रस्तावना –

अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांनी वाचा मधील अनुक्रमांक १ व ५ येथील पत्रांन्वये, पंचायत समिती, सिंदेवाही (जि.चंद्रपूर) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

**०२.** पंचायत समिती, सिंदेवाही, (जि. चंद्रपुर) येथील अस्तित्वातील प्रशासकीय इमारत ही सन १९५८ साली बांधलेली आहे. सदर इमारतीचे बांधकाम जीर्ण झाल्यामुळे व सदर इमारत ही प्रशासकीय कामाच्या दृष्टीने अपुरी असल्याने कामकाजामध्ये गैरसोयीचे आहे. यास्तव पंचायत समिती, सिंदेवाहीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम सर्व्हे क्रमांक २१२/२ या मोकळ्या जागेवर करण्याचे प्रस्तावित केले आहे. सदर जागा ही उपविभागीय अधिकारी यांचे आदेश क्र. अ.शा.प. शिल्लेदार/जमीन/३०/१०५३ दि.२७/०१/९० नुसार, पंचायत समिती सिंदेवाही करिता राखीव ठेवण्यात आली. पंचायत समिती, सिंदेवाही (जि. चंद्रपुर) येथील नवीन प्रशासकीय इमारतीकरिता तळमजल्याचे ८०.६७ चौ.मी., पहिला मजल्याचे ४८५.३४ चौ.मी. व दुसऱ्या मजल्याचे ४८५.३४ चौ.मी. असे एकुण १०५१.३५ चौ.मी. इतक्या बांधकामाचे क्षेत्रफळ प्रस्तावित

केलेले आहे. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, चंद्रपूर यांनी पंचायत समिती, सिंदेवाही नवीन प्रशासकीय इमारतीकरिता, उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर यांच्या जॉब क्र. NGP ३८४, DRG No. २ ते ५, दिनांक १७ डिसेंबर, २०१३ या नमुना नकाशावर आधारित, रू.१२३६.४२ लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केलेले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०२०-२१ च्या दरसूचीवर आधारित असून ते कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, चंद्रपूर, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी साक्षांकित केलेले आहे. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, चंद्रपूर यांनी प्रस्तावासोबत स्ट्रक्चरल ऑडिट रिपोर्ट पंचायत समितीच्या ठरावाची प्रत, जागेचा उतारा, लीड चार्ट, क्वॅरी चार्ट, ले-आऊट प्लॅन, अस्तित्वातील इमारत बांधकामाचे फोटो इत्यादी कागदपत्रे सादर केलेली आहेत.

०३. अतिरिक्त मुख्य कार्यकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती पंचायत समिती, सिंदेवाही, जिल्हा चंद्रपूर येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.१२३६.४२ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

पंचायत समिती, सिंदेवाही, जिल्हा चंद्रपूर येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रूपये १२,३६,४२,०००/- (रूपये बारा कोटी छत्तीस लक्ष बेचाळीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) प्रस्तुत बांधकामास तांत्रिक मान्यता देण्यापुर्वी संकल्पन तपासून घेणे आवश्यक राहील.
२) प्रस्तुत इमारतीचे बांधकाम मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.मंडळ, मुंबई यांच्याकडील विहित नमुना आराखड्यानुसार हाती घेण्यापूर्वी, स्थानिक नगररचना प्राधिकरणाची तसचे अग्निशमन यंत्रणेची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.
३) सिंदेवाही पंचायत समिती (जि. चंद्रपूर), येथील नवीन प्रशासकीय इमारतीकरिता शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर/मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करून घेणे बंधनकारक राहील.
४) नियोजित आराखड्यात महिला पदाधिकाऱ्यासाठी प्रसाधनगृहासह विश्रांती कक्षाचे संकल्पन करण्यात येवून, सदर व्यवस्था इमारतीमध्ये निर्माण करण्यात यावी.
५) प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुवीजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य

जलपुन:र्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

६) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करून, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

७) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

८) या कामी प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो संबंधित पंचायत समिती/जिल्हा परिषदेने सोसावा.

९) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

१०) प्रत्यक्ष इमारतीचे बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग क्र.ईएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

०२. पंचायत समिती सिंदेवाही (जि.चंद्रपूर) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे.

| **General Abstract For Construction of SINDEVAHI P. S. Administrative Building** | | | |
|---|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | | **Cost (In Rs.)** |
| **(A) Essential items** | | | |
| **1** a | Building proper (Built up area-sqm) | | |
| | Still floor (80.57sqm) | | |
| | $1^{st}$ floor (485.34sqm) | | |
| | $2^{nd}$ floor (485.34sqm) | | |
| **Total** | | | **44502821.00** |
| b | Rain/roof water harvesting | | 750530.00 |
| c | Solar roof top | | 2000000.00 |
| d | Furniture | | 10000000.00 |
| **Total (b+c+d)** | | | **12750530.00** |
| **2** | Water supply and sanitary work | | Included in main building |
| **3 (A)** | Electrification | External (6% of a) | 2670169.00 |
| | | Internal (5% of a) | 2225141.00 |
| | Fire Fighting Arrangments etc. (2% of a) | | 890056.00 |
| **Total (3A)** | | | **5785366.00** |
| **3 (B)** | Other electrical items | | |
| | Supply charges of MSEDCL (MSEB) | | 1000000.00 |
| | Solar energy systems/Renewal energy systems | | 1500000.00 |
| | Transformer/Electric sub-station etc. | | 500000.00 |
| | Any other electrical item (projector etc.) | | 500000.00 |

| General Abstract For Construction of SINDEVAHI P. S. Administrative Building | | |
|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **Cost (In Rs.)** |
| **Total (3B)** | | 3500000.00 |
| **Sub Total ( 3A+3B)** | | **9285366.00** |
| **Sub Total ( 1+2+3)** | | **66538717.00** |
| **(B)** | **Miscellaneous civil items** | |
| I | Compound wall & Entrance Gate (with beutification) | 3940960.00 |
| II | Internal roads ( C.C.) pathway | 2922266.00 |
| III | Development of ground (250 Rmt) | 195643.00 |
| IV | Parking | 1000000.00 |
| V | Soil investigation | 100000.00 |
| VI | C.C. Drains (200 Rmt) | 195643.00 |
| VII | Dismaintaing | 1000000.00 |
| **Total (B)** | | 9354512.00 |
| **Sub Total ( 1+2+3+B)** | | **77135593.00** |
| **(C)** | OPTIONAL ITEMS | |
| 1 | Underground water tank for rainwater harvesting | 500000.00 |
| 2 | Water main storage, Pump house, Borewell, etc. | 618093.00 |
| 3 | Airconditions / Central cooling | 2000000.00 |
| 4 | Lifts | 2500000.00 |
| 5 | External toilets | 1000000.00 |
| 6 | AB Room, Area lightings, pumps, generator | 2000000.00 |
| 7 | CCTV | 500000.00 |
| 8 | Sewerage Treatment Plant | 2000000.00 |
| **Total (C)** | | **11118093.00** |
| **Sub Total (A) + (B) + (C)** | | **88259686.00** |
| **(D)** | PROVISIONS | |
| i | Royalty + Testing Charges (as per estimate) | 527928.00 |
| ii | Contegencies (5%) | 4412684.00 |
| iii | Green Building Concepts (5%) | 4412684.00 |
| iv | GST (12%) | 10590442.00 |
| v | Price Escalation / Probable changes in SSR (10%) | 8825969.00 |
| vi | Architecture Services (3 to 5% pts.) (3.00%) | 2647611.00 |
| vii | Charges of RCC Design Scrutiny (1.25%) | 1103171.00 |
| viii | Charges of technical Sanction (1.25%) | 1103171.00 |
| ix | Insurance (0.5%) | 441268.00 |
| x | Add for T.A. & T.S. (1.5%) | 1323805.00 |
| **Total Cost Of The Project (A+B+C+D)** | | **123641819.00** |
| **Says** | | **12,36,42,000/-** |

०३. उपरोक्त बांधकामासाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरूपात, टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो

उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**०४.** प्रस्तुतचा शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौ.सं. क्र. ४७०/२१/व्यय-१५, दिनांक ०९ ऑगस्ट, २०२१ रोजीच्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१६१७४५५७००२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e86ac5658c4f446f46a56052bf048257ffe4ea09078de9d556ae5babe8adc8b1, pseudonym=37D9D56800E3803E7F4DEAA21F9F7FAB712736F6, serialNumber=481AF6EECE7C1D432D3119135BE703BF6529E7A455A9B17708C677B565D8EE24, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2021.09.21 13:19:15 +05'30'

**(प्रविण जैन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२. अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
४. सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र -२, नागपूर.
६. विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर विभाग, नागपूर.
७. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर.
१०.अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर.
११.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर.
१२.कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, चंद्रपूर.
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा चंद्रपूर.
१४.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१५.उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नागपूर विभाग, नागपूर.
१६.जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, चंद्रपूर.

१७.गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सिंदेवाही, जि. चंद्रपूर.
१८. सभापती, पंचायत समिती, सिंदेवाही, जि. चंद्रपूर.
१९.वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई.
२०.नियोजन विभाग (का.१४४४), मंत्रालय, मुंबई.
२१.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई.
२२.कार्यासन वित्त-१ व योजना-७, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३.निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.